नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत शासकीय गोदाम बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.
( मौ.दिवे ता.पुरंदर, जि.पुणे)

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदाबां- १०१३/प्र.क्र.५९७/नापु-१६ ब,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार , मुंबई-४०००३२
तारीख: २१ जून, २०१७.

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः गोदाबां- १०१२/१०२४/प्र.क्र.९१/नापु-१६ ब, दि. १३ .१.२०१३.**

२) **कार्यकारी अभियंता,सा.बां. (दक्षिण) विभाग, पुणे.१, यांचे पत्र क्र.प्र.शा.४/१०३०८/२०१४, दिनांक १.१०.२०१४.**

प्रस्तावना -

दिनांक १३ जानेवारी, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सासवड जि. पुणे येथे १८०० मे.टन क्षमतेच्या गोदाम बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. मात्र प्रस्तावित गोदाम बांधकामासाठी जागेच्या अनुपलब्धतेमुळे उक्त १८०० मे.टन क्षमतेच्या गोदाम बांधकामाऐवजी मौ.दिवे, ता.पुरंदर येथे १८०० मे.टन क्षमतेचे गोदाम बांधण्यास मंजूरी देण्याची विनंती जिल्हा पुरवठा अधिकारी, पुणे यांनी केली होती. त्यानुषंगाने सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अन्नधान्याच्या साठवणूकीसाठी मौ.दिवे, ता.पुरंदर जि. पुणे येथील गोदाम बांधकामाचा प्रस्ताव कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण) विभाग, पुणे १ यांच्या दि. १ ऑक्टोबर, २०१४ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे. सदर गोदामाच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविली आहे. सबब, सासवड येथील प्रस्तावित गोदाम बांधकाम रद्द करण्याची व मौ.दिवे, ता.पुरंदर जि. पुणे शासकीय गोदाम बांधणीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

संदर्भाधीन दिनांक १३ जानेवारी,२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सासवड येथील गोदाम बांधकामास दिलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येत आहे.

२. मौ.दिवे, ता.पुरंदर जि. पुणे, येथील गोदाम बांधकामाच्या अंदाजपत्रकास व कामास पुढील अटींच्या अधीनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

अ. अंदाजपत्रके सन २०१४-१५ साठी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी निश्चित केलेल्या जोते क्षेत्राच्या दरावर आधारित तयार करण्यात आली आहेत.

आ. अंदाजपत्रकांमध्ये गोदामांचे बांधकाम, आवश्यक जोडरस्ते व संरक्षक भिंतीचे बांधकाम करण्याच्या बाबी समाविष्ट करण्यात आल्या आहेत.

इ. अंदाजपत्रके सार्वजनिक बांधकाम विभागाच्या उप अभियंता, सा.बां.उपविभाग, भोर/सासवड यांनी तयार केली असून कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग( दक्षिण), पुणे यांनी व अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ पुणे, मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, पुणे यांनी प्रतिस्वाक्षरी केली आहे. अन्न व नागरी पुरवठा विभागाच्या वतीने जिल्हा पुरवठा अधिकारी, पुणे यांनी साक्षांकन केले आहे.

ई. अंदाजपत्रके अन्न व नागरी पुरवठा विभागाने तयार करुन मान्य केलेल्या इमारतीच्या सविस्तर आराखड्यांवर आधारीत आहे.

उ. अंदाजपत्रकात कामाच्या विम्यासाठी १ %, गुणनियंत्रणाच्या चाचण्यांसाठी ½ %, आकस्मिक खर्चासाठी ४ %, विद्युतीकरणासाठी ११ % व बाह्यपाणीपुरवठा व मलनिस्सारणासाठी ८ % इतक्या रकमेची तरतुद करण्यात आली आहे.

ऊ. अंदाजपत्रकांमध्ये संगणकीकरणासाठी करण्यात आलेली २ % रकमेची तरतूद आता वगळण्यात आली आहे.

३. शासकीय गोदाम बांधकामाची यादी

| **जिल्हा** | **तालूका** | **प्रस्तावित गोदामाचे ठिकाण** | **गोदाम सख्या** | **प्रस्तावित गोदामाची क्षमता मे.टन** | **प्रस्तावित अंदाजपत्रकीय खर्च (रू.)** | **सार्वजनिक बांधकाम विभाग मंत्रालय यांच्याकडील छाननीअंती मान्य अंदाजपत्रकीय खर्च (रू.)** |
|---|---|---|---|---|---|---|
| पुणे | पुरंदर | मौ.दिवे | १ | १८०० | २,२९,७१,०५३ | २,२५,८८,७३९ |
| | **एकूण रु.दोन कोटी पंचविस लाख अठ्ठयाएंशी हजार सातशे एकोणचाळीस फक्त** | | | | | |

४. प्रस्तावित कामाचे वर्षनिहाय खर्चाचे नियोजन पुढीलप्रमाणे राहील.

| आर्थिक वर्ष | अपेक्षित खर्च (रु. कोटी) | सुरु असलेल्या इतर कामांसाठी आवश्यक तरतुद (रु. कोटी) | एकूण मंजुर तरतुद(रु. कोटी) |
|---|---|---|---|
| सन २०१७-१८ | १.१२ | ११०.६२ | ८० |
| सन २०१८-१९ | १.१३ | ३०.६२ | ८६.४ |

५. सुरु असलेल्या कामाच्या वित्तीय नियोजनाचा तपशील पुढीलप्रमाणे-

| अ.क्र. | कामाचे नाव | एकूण अपेक्षित खर्च रुकोटी. | मागील वर्षाअखेर झालेला खर्च रुकोटी . | चालु वर्षात अपेक्षित खर्च रु.कोटी | पुढील वर्षासाठी carry forward करावयाची तरतूद रु.कोटी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | गोदाम बांधकाम (एकूण २३३ गोदाम बांधकामे) | ३२३.८८ | २१३.२६ | ८० | ३०.६२ |

६. वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या नविन शासकीय गोदाम बांधकामाकरीता निधी उपलब्ध होताच गोदाम बांधकामाचे काम तातडीने सुरू करण्यात येऊन विहित मुदतीत पूर्ण करण्यात यावे

७. सदरील शासकीय गोदाम बांधकामाचे काम पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी घ्यावी.

८. सदर गोदाम बांधकामावरील खर्च सन २०१७-१८ या वित्तीय वर्षात व तद्‌नंतर वेळोवेळी उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या तरतुदीमधून भागविण्यात येईल.

९. उपरोक्त खर्च “मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष “ ४४०८, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक यावरील भांडवली खर्च ०१/ अन्न १०१ प्रापण व पुरवठा , ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक १०१, ग्रामीण गोदाम कार्यक्रम, (०१) नवीन गोदामांचे बांधकाम (०१) (०१) नवीन गोदामांचे बांधकाम (मुफसल ) (योजनेंतर्गत ) (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे “ या लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

१०. बांधकामासाठी विलंब अथवा इतर कारणाने वाढीव खर्च होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर गोदामाचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावे. सदर गोदाम बांधकामाच्या कामांना आवश्यकतेनुसार निधी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करून देण्यात येईल.

११. सदर गोदामांचे बांधकामाचे काम प्रगतीपथावर असताना संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरूपात सादर करावा.

१२. गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यांनंतर गोदामाचा ताबा घेण्यापूर्वी सदर गोदामास जिल्हाधिकारी यांनी स्वत: भेट देऊन झालेले काम हे उत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबत खातरजमा करावी. काही त्रुटी राहून गेल्या असल्यास त्याची पूर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावी व त्याचा स्थळ निरिक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

१३. काम सुरू करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घेण्यात यावी.

१४. गोदाम बांधकामाच्या अंदाजपत्रकातील मुख्य गोदाम बांधकामाव्यतिरिक्त इतर सोयी सुविधांच्या समावेशाबाबत शासन स्तरावरुन दिलेल्या विविध सुचना विचारात घेवून जिल्हाधिकारी यांच्या स्तरावर खातरजमा करुन वजन काटे कार्यालये, प्रसाधन गृहे, इ. सोयींचा आवश्यकतेनुसार अंतर्भाव करावा.

१५. क्षेत्रीय स्तरावरुन प्राप्त अंदाजपत्रकाच्या छाननीअंती सार्वजनिक बांधकाम विभागाने Recapitulation Sheet मध्ये सुधारणा केल्या आहेत. सदर Recapitulation Sheet व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीसंबधी टिपणीच्या प्रती जिल्हाधिकारी व कार्यकारी अभियंता यांना निर्गमित करावयाच्या प्रतीसोबत जोडली आहे.

१६. वित्त विभागाच्या दि. १६ जानेवारी १९८४ च्या शासननिर्णयानुसार शासनाच्या प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष नियंत्रणाखालील मालमत्तेचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरविणे बंधनकारक असल्याने या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात येत असलेल्या दिवे ता. पुरंदर येथील शासकीय गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर गोदामाचा/ गोदामातील साठ्याच्या विमा शासकीय विमा निधीकडे उतरविण्यात यावा.

१७. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग पहिला, उप विभाग ५ मधील महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेअंतर्गत अनुक्रमांक-१ परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक-२४/ इमा-२, दिनांक १६.२.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२११७०५२९७६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Deoman Baswant

Digitally signed by Sunil Deoman Baswant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=F.C.S and C.P. Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8883fe608dc825b4f80204357f8a6fadfe8507e0636b91f3c5fefef9c43acfe1, cn=Sunil Deoman Baswant
Date: 2017.06.21 17:02:57 +05'30'

**( सु.दे.बसवंत )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. उप आयुक्त (पुरवठा), पुणे.
२. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
३. जिल्हाधिकारी, पुणे.
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे .
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे.
६. जिल्हा पुरवठा अधिकारी, पुणे.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई. (वित्तीय सल्लागार व उपसचिव मार्फत)
११. वित्त विभाग (व्यय-४, अर्थबळ अर्थोपाय व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.
१३. उपमहाव्यवस्थापक,नाबार्ड,५४,वेलस्ली रोड,शिवाजीनगर पुणे ४११००५.
१४. निवड नस्ती/नापु-१६ब.